**महाराष्ट्र शासनाच्या राज्य अभ्यासक्रमाच्या शाळा वगळून राज्यातील इतर परीक्षा मंडळाच्या शाळांमध्ये सन २०२३-२४ पासून पुढील तीन वर्षापर्यंत इयत्ता आठवी, नववी व दहावीच्या विद्यार्थ्यांचे मराठी विषयाचे मुल्यांकन करतांना 'श्रेणी' स्वरूपात (अ,ब,क,ड) करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण - २०२०/प्र.क्र.१८२/एसडी-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १९ एप्रिल, २०२३.

वाचा:- शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१९/प्र.क्र.७८/एसडी-४, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई, दिनांक ०१ जून,२०२०.

**प्रस्तावना:**

शासन निर्णय दि.१ जून, २०२० नुसार महाराष्ट्र राज्यातील सर्व परीक्षा मंडळाचे अभ्यासक्रम असलेल्या सर्व माध्यमांच्या शासकीय व खाजगी व्यवस्थापनाच्या सर्व शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्यात आलेले आहे. राज्यातील केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ (सी.बी.एस.ई.) भारतीय माध्यमिक शिक्षण मंडळ (आय.सी.एस.ई.), आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (आय. बी.) तसेच केंब्रीज व अन्य मंडळाचे अभ्यासक्रम असलेल्या खाजगी / केंद्रीय अशा सर्व शाळांसाठी सदर शासन निर्णयातील परिशिष्ठ 'ब' नुसार अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तके निर्धारित करण्यात आलेली आहे.

मराठी भाषेच्या अध्यापन-अध्ययन सक्तीबाबतच्या या निर्णयाची अंमलबजावणी कोविड-१९ या महामारीच्या कालावधीत सुरू झाली. या कालावधीत नियमित शाळा सुरु राहण्यास अनेक अडचणी आलेल्या होत्या. त्यामुळे सन २०२०-२१ पासून सुरु झालेल्या सक्तीच्या मराठी भाषा अध्यापन-अध्ययन प्रक्रियेवरही प्रतिकूल परिणाम होऊन मराठी विषयाच्या अध्ययनामध्ये व पर्यायाने संपादणूकीमध्ये विद्यार्थ्यांना अडचणी आलेल्या आहेत असे दिसून येते. राज्य अभ्यासक्रमाच्या व्यतिरिक्त इतर परीक्षा मंडळाच्या विद्यार्थ्यांना मराठी विषय नवीन असल्याने त्यांच्या बाबतीत ही बाब अधिक प्रकर्षाने आढळून येत आहे. या सर्व बाबींचा विचार करता इतर परीक्षा मंडळांच्या विद्यार्थ्यांच्या मराठी भाषा मूल्यांकनाबाबत सुलभता येण्यासाठी योग्य निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र शासनाच्या राज्य अभ्यासक्रमाच्या शाळा वगळून राज्यातील इतर परीक्षा मंडळाच्या शाळांमध्ये सन २०२३-२४ पासून पुढील तीन वर्षापर्यंत इयत्ता आठवी, नववी व दहावीच्या विद्यार्थ्यांचे

मराठी विषयाचे मुल्यांकन करतांना 'श्रेणी' स्वरूपात (अ,ब,क,ड) केले जावे. तसेच सदर मूल्यांकनाचा समावेश या परीक्षा मंडळांच्या इतर विषयांच्या एकत्रित मूल्यांकनामध्ये करण्यात येऊ नये, शासन निर्णय दि.१ जून, २०२० मधील परिशिष्ट 'ब' नुसार श्रेणी निश्चिती व मूल्यांकन बाबत वरील निर्णयानुसार योग्य ती कार्यवाही करण्याची जबाबदारी संबंधित परीक्षामंडळ/ व्यवस्थापनाची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४१९१७०५५९६२२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

IMTIYAZ MUSHTAQUE KAZI

Digitally signed by IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=39a40419de755c2eab61fb555b2fdf8c8d6d652ff18fdffbd9c748ab01f6da04, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=77A529748C5E7C1BA7A66E81C654BA3C492FDA5B29E076241DB1BA213DDEDF4E, cn=IMTIYAZ MUSHTAQUE KAZI
Date: 2023.04.19 17:12:08 +05'30'

**( इ. मु. काझी )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा .राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन, मुंबई,
२. मा . मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई,
३. मा . उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई,
४. मा.अध्यक्ष,विधानसभा,महाराष्ट्र,मुंबई
५. मा.सभापती,विधानपरिषद,महाराष्ट्र,मुंबई
६. मा.मंत्री,शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव,
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई ,
८. मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई ,
९. प्रधान सचिव,शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक,
१०.शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने ,
११.महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई ( प्रसिद्धी देण्यासाठी )
१२. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई
१४. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य
१५. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे
१६. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) शिक्षण संचालनालय, पुणे
१७. शिक्षण संचालक (प्राथमिक) शिक्षण संचालनालय, पुणे
१८. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे
१९. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, बालभारती, पुणे
२०. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे

२१. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
२२. मुख्य अधिकारी सर्व (द्वारा संबंधित जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक)
२३. प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व)
२४. शिक्षणाधिकारी सर्व (प्राथमिक/माध्यमिक) जिल्हा परिषद
२५. शिक्षणाधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
२६. शिक्षण निरीक्षक बृहन्मुंबई (पश्चिम, उत्तर, दक्षिण)
२७. अध्यक्ष/सचिव, (सी.बी.एस.ई. बोर्ड), प्रीती विहार,दिल्ली-११००९२.
२८. अध्यक्ष/सचिव, (आय.सी.एस.ई. बोर्ड),नेहरू पॅलेस,नवी दिल्ली-११००१९.
२९. अध्यक्ष/सचिव, (आय.बी.बोर्ड), गणपतराव कदम मार्ग,लोअर परेल (प.),मुंबई-४०००१३.
३०. अध्यक्ष/सचिव,(केंब्रीज),कोलाबा,मुंबई-४००००५.
३१. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
३२. प्रसिद्धी अधिकारी, शालेय शिक्षण, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
३३. सर्व कार्यासने शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३४. निवड नस्ती, (कार्यासन एसडी-४).